तात्काळ

आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील व्यक्तींना शासकीय व निमशासकीय सेवेत आरक्षण.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक-एसआरव्ही-१०८४/१३८४/प्र. क्र. ५२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० जून, १९८४.

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७१/८४५४-डी, दिनांक २९/३/१९७२.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही-१०७९/८८/१६-अ, दिनांक २७/४/१९७९.

## परिपत्रक

समाजातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील व्यक्तींसाठी शासन सेवेमध्ये त्याचप्रमाणे शासकीय मदतीवर चालविण्यात येणारी महामंडळे/उपक्रम, औद्योगिक संस्था, सहकारी संस्था जिल्हा परिषदा, महानगरपालिका, यांमध्ये ८० टक्के रिक्त पदे आरक्षित ठेवण्याबाबतचे आदेश वर उल्लेखिलेल्या आदेशान्वये निर्गमित केलेले आहेत.

२. अलिकडेच काही तहसिलदारांनी मुंबई उच्च न्यायालयामध्ये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील व्यक्तींसाठी तहसिलदारांची पदे आरक्षित ठेवण्याविरुद्ध याचिका क्रमांक २१८०/८३ दाखल केली होती. या याचिकेच्या निकालपत्रात उच्च न्यायालयाने असे म्हटले आहे की, आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी तहसिलदारांची ४८ टक्के पदे राखीव ठेवण्याला कायद्याचा कोणताही आधार मिळू शकत नाही. उच्च न्यायालयाच्या निकालात पुढे असेही म्हटले आहे की, अनुसूचित जाति (धर्मांतरित नवबौद्धांसहित) अनुसूचित जमाति, भटक्या व विमुक्त जाती-जमाति व इतर मागासवर्गीय यांच्या बाबतीत पदांचे आरक्षण कायदेशीरदृष्ट्या समर्थनीय आहे.

३. शासनाच्या प्रचलित धोरणानुसार आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील व्यक्तींसाठी आरक्षित करण्यात येणाऱ्या ८० टक्के रिक्त पदांमध्ये मागासवर्गीयांसाठीची ३४ टक्के राखीव पदे व वर्ग ३ व वर्ग ४ मधील इतर विशिष्ट गटांसाठी राखीव पदे खाली विशद केल्याप्रमाणे समाविष्ट आहेत.

| गट | वर्ग १. | वर्ग २. | वर्ग ३. | वर्ग ४. |
| --- | --- | --- | --- | --- |
| १. मागासवर्गीय (अनुसूचित जाति/ अनुसूचित जमाति/ विमुक्त जाति/भटक्या जमाति व इतर मागासवर्गीय) | ३४% | ३४ % | ३४ % | ३४ % |
| २. प्रकल्पग्रस्त | – | – | ५ % | ५ % |
| ३. माजी सैनिक | – | – | १५ % | १५ % |
| ४. अपंग व्यक्ती | – | – | ३ % | ३ % |
| ५. आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक. | ४६ % | ४६ % | २३ % | २३ % |
| एकूण रक्षीव पदे | ८० % | ८० % | ८० % | ८० % |

४. उच्च न्यायालयाच्या निकालाविरुद्ध सर्वोच्च न्यायालयामध्ये अपील करण्यासंबंधी कार्यवाही करण्यात येत आहे. दरम्यान, आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील व्यक्तींसाठी आरक्षित करावयाच्या वर्ग १ व वर्ग २ मधील ४६ टक्के आणि वर्ग ३ व वर्ग ४ मधील २३ टक्के रक्षीव पदांबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी असे आदेश देण्यात येत आहेत.

५. मंत्रालयीन विभाग आणि मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विविध विभाग प्रमुख तसेच शासकीय उपक्रम/महामंडळ, औद्योगिक संस्था, सहकारी संस्था, जिल्हा परिषदा, महानगरपालिका यांच्या कार्यालयांमध्ये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी (४६ % किंवा २३ %) राखून ठेवण्यात आलेली पदे भरण्याची कार्यवाही पुढील आदेशापर्यंत लांबणीवर टाकण्यात यावी. त्याचप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे १९८४ मधील विविध परीक्षांसाठी मागणीपत्र पाठविलेल्या आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील व्यक्तींसाठी रक्षीव असलेल्या पदांवर भरती करण्याबाबतची कार्यवाही पुढील आदेश होईपर्यंत लांबणीवर टाकण्यात यावी.

६. मंत्रालयीन विभाग व विभाग प्रमुख यांनी वरील आदेशाप्रमाणे तत्काळ कार्यवाही

करावी. त्याचप्रमाणे मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संबंधित शासकीय उपक्रम, महामंडळे, औद्योगिक संस्था, सहकारी संस्था व महानगरपालिका इत्यादींना ह्यासंबंधी आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मुकुंद स. गोकर्णी
( मुकुंद स. गोकर्णी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक उच्च न्यायालय ( मूळ शाखा ) मुंबई (पत्राने)
प्रबंधक उच्च न्यायालय ( अपील शाखा ) मुंबई (पत्राने)
प्रबंधक लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने)
सचिव महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
संचालक सेवायोजन मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख
सर्व शासकीय उपक्रम व महामंडळे
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र. १२, १३-अ/१४/१५-अ/१८-ब.

टीकेमा